राज्यातील सर्व औष्णिक विद्युत निर्मिती केंद्रातील/बायोमास प्रकल्पातील /घनकचरा विद्युत निर्मिती प्रकल्पातील राखेच्या वापरासंबंधीचे धोरण- २०१६

# महाराष्ट्र शासन

## उद्योग ऊर्जा व कामगार विभाग,

### शासन निर्णय क्रमांक : धोरण २०१५/प्र.क्र.५३७/ऊर्जा-४

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक : १३ डिसेंबर, २०१६

**प्रस्तावना :-**

केंद्र सरकारच्या पर्यावरण व वन मंत्रालयाने दिनांक ०२.०१.२०१४ रोजीच्या अधिसूचनेद्वारे असे निदेश दिले आहेत की, औष्णिक वीज निर्मिती केंद्रांना ३४ टक्क्यापेक्षा जास्त राख समाविष्ट नसलेला कच्चा किंवा मिश्रण केलेल्या कोळशाचा पुरवठा करावा व या केंद्रांनी सुद्धा याच दर्जाचा कोळसा वापरावा, औष्णिक वीज निर्मिती केंद्रामधील कार्बनचे उत्सर्जन कमी व्हावे यासाठी उत्सर्जनाची कडक मानके योजण्यात यावीत. तसेच फ्लाय ॲशमुळे प्रदूषण कमी व्हावे यासाठी केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाने फ्लाय ॲशचा १०० टक्के वापर करावा असे आदेश दिले आहेत. फ्लाय ॲशचे रुपांतर फ्लाय ॲश आधारित उत्पादनांमध्ये करण्यात यावे, फ्लाय ॲश हवेत पसरू नये याकरिता जास्तीत जास्त फ्लाय ॲश कशाप्रकारे उपयोगात आणली जाईल या संदर्भात शासनाने वेळोवेळी अधिसूचना निर्गमित केल्या आहेत.

विटा, ब्लॉक्स, टाईल्स, व इतर बांधकाम साहित्य उत्पादित करणाऱ्या उद्योगांद्वारे कच्चा माल म्हणून मृदेचे मोठया प्रमाणावर उत्खनन होत असते. त्यामुळे मृदेचा ऱ्हास होऊन पर्यावरणास हानी पोचू शकते. सदर ऱ्हास टाळण्यासाठी व मृदेचे (Soil) उत्खनन कमी प्रमाणात होण्यासाठी केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाने Environment (Protection) Rules १९८६ च्या कलम ५ (३) अनुसार दि.१४.०९.१९९९ ची अधिसूचना निर्गमित केली आहे व सदर अधिसूचनेत दि. २७.०८.२००३ व दिनांक २५.०१.२०१६ च्या अधिसूचनेद्वारे सुधारणा देखील केली आहे. या अधिसूचनान्वये लिग्नाईट तथा कोळसा आधारित औष्णिक विद्युत प्रकल्पांमधून बाहेर पडणाऱ्या फ्लाय ॲशचा वापर विटा, ब्लॉक्स, टाईल्स तसेच बांधकामाच्या इतर साहित्याचे उत्पादन करण्यात व रचनात्मक उभारणीच्या कामात करण्याबाबत निदेश दिले आहेत. सदर निदेशांच्या अनुषंगाने महाराष्ट्रातील फ्लाय ॲश विनियोगाबाबतचे धोरण निश्चित करणे शासनाच्या विचाराधीन होते.

महाराष्ट्राची वीज निर्मितीची सध्याची स्थापित क्षमता ३१,१७० मेगा वॅट इतकी आहे. महाराष्ट्राच्या एकूण वीज निर्मितीपैकी ७१ टक्के वीज ही कोळशापासून निर्माण केली जाते. देशातील औष्णिक वीज निर्मिती प्रकल्पासाठी वापरण्यात येणाऱ्या कोळशामध्ये सुमारे ४० टक्क्यापेक्षा जास्त राखेचे प्रमाण असल्यामुळे प्रचंड प्रमाणात राख तयार होते. शासनाने वीज निर्मिती केंद्रांची कार्यक्षमता सुधारण्यासाठी आणि त्यामधून उत्सर्जित होणाऱ्या कार्बनचा प्रभाव कमी करण्यासाठी यापूर्वीच उपाययोजना अंमलात आणण्यास प्रारंभ केला असून अत्याधुनिक व उच्च दर्जाचे तंत्रज्ञान (Super Critical Technology) वापरण्याबाबत सर्व नवीन औष्णिक वीज निर्मिती केंद्रांना बंधनकारक करण्यात आले आहे. केंद्र शासनाच्या पर्यावरण व वन मंत्रालयाच्या विविध अधिसूचनांद्वारे निर्गमित सूचनांच्या अनुषंगाने राज्यातील औष्णिक वीज निर्मिती केंद्रातील तसेच बायोमास प्रकल्पातील व घनकचरा विद्युत निर्मिती प्रकल्पातून निर्माण होणाऱ्या राखेच्या वापरासंदर्भात धोरण ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा प्रस्ताव दिनांक १५.११.२०१६ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीस सादर करण्यात आला होता. त्यास मंत्रिमंडळाने काही सुधारणासह मान्यता दिली आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१. राज्यातील सर्व औष्णिक विद्युत निर्मिती केंद्रातील/बायोमास प्रकल्पातील व घनकचरा विद्युत निर्मिती प्रकल्पातील राखेच्या वापरासंबंधीचे धोरण-२०१६ या आदेशान्वये खालील प्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाच्या पर्यावरण, वने व हवामान बदल मंत्रालयाने Environment (Protection) Rules १९८६ च्या कलम ३ (२) (v) नुसार दिनांक १४.०९.१९९९ च्या अधिसूचनेमध्ये सुधारणा करुन दिनांक २५.०१.२०१६ ची अधिसूचना निर्गमित केली आहे. सदर अधिसूचनेमध्ये कोळसा आणि लिग्नाईट वर आधारित औष्णिक विद्युत केंद्रात निर्माण होणाऱ्या राखेचा (Fly Ash) वापर करण्यासंदर्भात अद्ययावत दुरुस्त्यांमध्ये फ्लाय ॲशचा वापर अधिक प्रभावी व व्यापक स्तरावर आणि लाभदायक कामामध्ये करावा, या राखेपासून बांधकाम क्षेत्रात उपयुक्त अशी उत्पादने निर्माण करण्यास तसेच राखेमुळे शेतातील मातीत सुधारणा करण्यास (Conditioning) अधिक प्रोत्साहन द्यावे, परिणामत: वायू प्रदूषण कमी होईल व राखेची विल्हेवाट लावण्यास जागाही कमी लागेल. अशा प्रकारच्या मार्गदर्शक सूचनांच्या समावेश आहे. त्यामधील विनिर्दिष्ट सूचना खालील प्रमाणे आहेत (Specific) :-

**१.** मूळ अधिसूचनेत राखेचा वापर करणे बंधनकारक केलेले क्षेत्र औष्णिक विद्युत केंद्रापासून १०० कि.मी. त्रिज्येच्या परिसरात होते. ही मर्यादा आता १०० कि.मी.

वरुन ३०० कि.मी. अशी विस्तारण्यात आलेली आहे. त्यामुळे कोळसा/ लिग्नाईटवर आधारित औष्णिक विद्युत निर्मिती केंद्रापासून ३०० कि.मी. त्रिज्येच्या परिसरात इमारती व अन्य बांधकाम करणाऱ्या सर्व संस्था (कंपन्या/फर्म/विकासक) यांना त्यांच्या बांधकामाच्या कार्यात राखेची (Fly Ash) उत्पादने वापरणे शक्य होईल. त्यामुळे आता अधिक व्यावसायिकांना राखेचा वापर करण्यास प्रोत्साहन मिळेल.

२. केंद्र शासनाच्या दिनांक २५.०१.२०१६ च्या अधिसूचनेतील नियम क्र. १ अनुसार औष्णिक विद्युत केंद्रा (Thermal Power Plant) पासून १०० कि.मी. च्या त्रिज्येमधील फ्लाय ॲश वाहतुकीचा खर्च औष्णिक विद्युत केंद्रातर्फे केला जाईल. या राखेपासून बांधकामासाठी उत्पादने तयार करणारे कारखाने, रस्ता बांधणीचे प्रकल्प आणि शेतीच्या उपयोगासाठी राख हवी असणारे शेतकरी यांना १०० कि.मी. अंतरापर्यंत वाहतूक खर्च करावा लागणार नाही. राखेचे जे वापरकर्ते १०० कि.मी. पेक्षा जास्त पण ३०० पेक्षा कमी अंतरावर आहे त्यांना पुरविण्यात येणाऱ्या वाहतुकीचा खर्च, वापरकर्ते व औष्णिक विद्युत केंद्र यांच्यात ५०%- ५०% या प्रमाणात करण्यात येईल. त्यामुळे राखेपासून निर्माण करणाऱ्या उत्पादकांचा उत्पादन खर्च कमी होऊन त्यांच्या किंमती कमी होतील व सदर उत्पादने ग्राहकांना परवडणाऱ्या दरात उपलब्ध होतील. सदर तरतुदीनुसार वीज निर्मिती केंद्रांवर राख वाहतूकीपोटी येणारा प्रचंड प्रमाणावरील खर्च कमी करण्याच्या दृष्टीने वीज निर्मिती केंद्राच्या परिसीमेतच जास्तीत जास्त राखेचा विनियोग करणे हितावह ठरते.

३. केंद्र शासनाच्या दिनांक २५.०१.२०१६ च्या अधिसूचनेत नियम ४ मध्ये प्रधानमंत्री ग्रामीण सडक योजनेंतर्गत रस्ते बांधणीचे प्रकल्प आणि शासन निर्मीत प्रकल्प, महात्मा गांधी ग्रामीण रोजगार हमी कायदा-२००५, स्वच्छ भारत अभियान, शहरी व ग्रामिण गृहनिर्माण योजना इ. ज्यामध्ये बिल्टअप एरीया १००० चौरस फूटापेक्षा जास्त आहे अशी बांधकामे तसेच नामनिश्चित केलेले औद्योगिक वसाहती किंवा इंडस्ट्रियल पार्क किंवा विशेष आर्थिक परिक्षेत्रे (SEZS) यामधील पायाभूत सुविधा (Infrastructure) बांधकामे यामध्ये फ्लाय ॲश पासून तयार केलेल्या विटा किंवा अन्य साहित्य वापरणे बंधनकारक आहे. यामध्ये इमारती, रस्ते, धरणे, बंधारे

आदींचा समावेश आहे. या प्रकल्पांच्या जागेपर्यंत राखेची वाहतूक करण्याचा संपूर्ण खर्च संबंधित औष्णिक विद्युत निर्मिती केंद्राकडून करण्यात येईल.

४. उपरोक्त अधिसूचनेच्या नियम क्र. २ (a) अनुसार जी औष्णिक विद्युत निर्मिती केंद्रे निर्माण झालेल्या फ्लाय ॲशचा १०० टक्के वापर / विल्हेवाट विहित केलेल्या नियमाद्वारे स्वत:च करतात त्यांना तेथील २० टक्के राख विटांच्या उत्पादकांना विनामूल्य देण्याची बंधनकारक तरतूद लागू होणार नाही.

५. सदर अधिसूचनेच्या तारखेपासून ३ महिन्याच्या आत सर्व औष्णिक विद्युत केंद्रे त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या फ्लाय ॲशच्या साठयाची माहिती, स्वत: हून प्रदर्शित करतील आणि त्यानंतर प्रत्येक महिन्याला ती अद्ययावत करतील. त्यामुळे वापरकर्त्याला फ्लाय ॲश कुठे व किती प्रमाणात उपलब्ध आहे ते कळेल व ते संबंधित औष्णिक विद्युत केंद्राकडे संपर्क साधतील.

६. औष्णिक विद्युत केंद्रांनी फ्लाय ॲशच्या साठयापर्यंत जाण्यासाठी वेगवेगळे वाहतूक मार्ग उपलब्ध करुन देणे बंधनकारक केले आहे.

७. किनारपट्टीवर स्थापित कोळसा / लिग्नाईट आधारित औष्णिक विद्युत केंद्रांनी किनारपट्टीचे रक्षण व अन्य उपाय योजना यांच्या बांधकामांना पाठिंबा/ साहाय्य द्यावे व थेट त्यात सहभागी व्हावे त्यामुळे राखेचा वापर वाढेल.

८. औष्णिक विद्युत केंद्रांना त्यांच्या जागेत किंवा जवळपास किंवा शहराजवळ, फ्लाय ॲश आधारित उत्पादन निर्मिती करणारे उद्योग, कारखाने स्थापन करणे बंधनकारक केले आहे. ज्यामुळे राखेची वाहतूक कमी प्रमाणात होईल व उत्पादनासाठी राखेचा वापर करण्यास प्रोत्साहन मिळेल.

९. राज्याचे संबंधित क्षेत्रीय सक्षम प्राधिकारी, १ दश लक्ष किंवा त्याहून अधिक लोकसंख्येच्या शहरातील बांधकामासाठी फ्लाय ॲश आधारित विटा इ. साहित्य वापरणे बंधनकारक करण्यासाठी इमारतीचे उपविधी (Bye-Laws) यामध्ये दुरुस्त्या करतील. यामुळे फ्लाय ॲश विटांचा वापर होण्याची हमी मिळेल.

१०. राखेचा वापर करणे बंधनकारक केलेल्या परिसरातील रस्ते बांधणी किंवा अन्य क्षेत्र पायाभूत सूविधा प्रकल्पावर बांधकामाशी निगडीत असलेल्या कंत्राटदारास फ्लाय ॲशचा पुरवठा संबंधित औष्णिक निर्मिती (TPP/TPS) केंद्रामधून घेतल्याबद्दलचे प्रमाणपत्र सादर केल्यानंतरच त्यांच्या कामाचे पैसे देण्यात येतील.

११. कृषी मंत्रालयाद्वारे शेतकऱ्यांना शेत जमिनीच्या मातीची गुणवत्ता सुधारण्यासाठी (Soil Conditioning) फ्लाय ॲशचा वापर करण्याबाबत प्रोत्साहित करण्यात येईल. त्यामुळे फ्लाय ॲशचा वापर/मागणी वाढेल.

या सर्व (१ ते ११) तरतुदींची पूर्तता करण्यासाठी दि. ३१.१२.२०१७ पर्यंत कालमर्यादा देण्यात आलेली आहे. तसेच कोळसा / लिग्नाईट आधारित औष्णिक विद्युत निर्मिती केंद्रे, १०० टक्के फ्लाय ॲशचा वापर करण्यासह वरील सर्व तरतुदीची पूर्तता दि. ३१.१२.२०१७ पर्यंत करतील. त्याचप्रमाणे केंद्र शासनाच्या खालील सूचनांचे देखील सदर केंद्रानी पालन करणे आवश्यक आहे.

- ❖ केंद्र शासनाच्या शाश्वत विकासाच्या (Sustainable Development) धोरणानुसार हवामानासंबंधी कृती योजना जाहीर केली आहे. त्यानुसार सकल घरेलु उत्पादनामधून (GDP) होणारी उत्सर्जनाची तीव्रता कमी करण्याचा निर्णय घेतला आहे. उत्सर्जन तीव्रता कमी करण्याचे ध्येय गाठण्यासाठी कोळसा /Biomass/घनकचरा (Waste to Energy Project) आधारीत वीजनिर्मिती प्रकल्पात निर्माण होणाऱ्या फ्लाय ॲशचा १०० टक्के वापर करणे या धोरणांतर्गत अपेक्षित आहे.
- ❖ उपरोक्त तरतुदी, केंद्र किंवा राज्य किंवा स्थानिक शासनाच्या बांधकाम संस्थांना तसेच खाजगी किंवा सार्वजनिक क्षेत्रांना बंधनकारक असून त्याचे अनुपालन करणे, त्याची हमी घेणे, फ्लाय ॲशच्या वापरावर आधारीत बांधकामांची संकल्प चित्रे मंजूर करणे इ. जबाबदारी या संस्थांची असून या संस्था संबंधित राज्य प्रदुषण नियंत्रण मंडळ किंवा प्रदुषण नियंत्रण समिती यांना वार्षिक अहवाल सादर करतील.
- ❖ केंद्रीय विद्युत प्राधिकरणाच्या अहवालानुसार सन २०१४-१५ मध्ये महाराष्ट्रातील एकूण १८३३६ मे.वॅ. क्षमतेच्या १९ औष्णिक वीज निर्मितीच्या केंद्रामध्ये १८.६२५७ दशलक्ष टन फ्लाय ॲश निर्माण झाली. या अनुषंगाने योग्य धोरण अंमलात न आल्यास राखेची विल्हेवाट लावणे हे भविष्यात एक मोठे आव्हान असेल.
- ❖ सदर धोरण वर्ष २०१६ ते २०२० या ५ वर्षांसाठी असून त्यानंतर त्याचा आढावा घेऊन पुढील दिशा ठरविण्यात येईल.

## ३. धोरणाची उद्दिष्टे :

राज्यात अखंडितपणे व स्पर्धात्मक दराने पुरेशी वीज देण्याची सामाजिक बांधिलकी पूर्ण करताना कोणतीही तडजोड न करता फ्लायअॅशचा १०० टक्के वापर करण्यास प्रोत्साहन देणे हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी या धोरणात पुढील कृती समाविष्ट आहेत.

३.१ फ्लाय अॅश चे व्यवस्थापन सातत्य पूर्ण व पर्यावरण दृष्ट्या शाश्वत विकास पध्दतीने होईल याची हमी घेणे.

३.२ फ्लाय अॅशचा पर्यावरणावर विशेष करून मानवी आरोग्यावर होऊ शकणाऱ्या प्रभावाचे प्रमाण कमीत कमी ठेवणे.

३.३ उच्च कॅलोरिफिक मूल्य असलेला कोळसा वापरून किंवा अशा प्रकारचे मिश्रण करून फ्लाय अॅशची निर्मिती कमीतकमी प्रमाणात ठेवणे.

३.४ फ्लाय अॅशचा एक संसाधन म्हणून जास्तीत जास्त उपयोग केला जावा यासाठी प्रोत्साहन देणे.

३.५ फ्लाय अॅशचा वापर व वाहतूक याबाबतच्या व्यवस्थापन कार्याच्या मानकांमध्ये सातत्याने सुधारणा करणे.

३.६ राज्याच्या औद्योगिक दृष्ट्या कमी विकसित भागात फ्लाय अॅश मुबलक प्रमाणात उपलब्ध आहे, तेथे गुंतवणूकीचा ओघ वाढविणे.

३.७ औष्णिक विद्युत निर्मिती केंद्राच्या परिसरात राहणाऱ्या व समाजाच्या सर्व स्तरातील सुशिक्षित युवकांसाठी रोजगाराच्या अधिक संधी निर्माण करण्यासाठी स्थानिक उद्योजकांना पाठींबा देणे. या कामात प्रकल्पग्रस्त व्यक्तींना प्राधान्य देणे. राज्यातील पर्यावरणाचे रक्षण करणे हे या धोरणाचे उद्दिष्ट आहे व वर्ष २०२२ पर्यंत “सर्वांसाठी घर” हे ध्येय साध्य करण्यासाठी परवडणाऱ्या दरात फ्लाय अॅश आधारित बांधकाम साहित्य उपलब्ध करुन देणे.

३.८ राखेमध्ये असणाऱ्या ज्या घटकांमुळे पर्यावरणास हानी पोहचू शकते अशा घटकांचा शोध घेणे / ओळखून काढणे व त्यास प्रतिबंध करुन पर्यावरणाचे संरक्षण करणे तसेच पर्यावरणास पोषक घटकांची वाढ करणे.

३.९ प्रशासकीय प्राधिकरणाने सातत्यपूर्ण व योग्य निर्णय घेण्यासाठी एक आराखडा तयार करुन योग्य ती अंमलबजावणी करणे.

४. **धोरणाची व्याप्ती (Scope) :**

सदर राख उपयोगिता धोरणाची अंमलबजावणी संपूर्ण राज्यात केली जाईल व त्यामध्ये महाराष्ट्र राज्यातील सर्व (शासकीय व खाजगी) विद्यमान व भविष्यातील औष्णिक विद्युत प्रकल्प तसेच घनकचरा विद्युत प्रकल्प (Waste to Energy Project) व बायोमास प्रकल्पांनाही समाविष्ट केले जाईल.

५. **मिशन :-**

५.१ महाराष्ट्र हे राज्य फ्लाय ॲश आधारीत उद्योगातील गुंतवणूकीसाठी सर्वाधिक पसंतीचे क्षेत्र होण्यासाठी एक आक्रमक, प्रोत्साहनपर मोहीम आखणे.

५.२ राज्यातील गृहनिर्माण क्षेत्राच्या फ्लाय ॲश आधारित बांधकाम साहित्याच्या भविष्यातील गरजा संपूर्णपणे पूर्ण करणे.

५.३ फ्लाय ॲशचा १०० टक्के उपयोग करणे, त्याद्वारे सिमेंट, विटा इत्यादी उद्योग प्रक्रिये मधील कार्बन उत्सर्जन कमी करणे.

५.४ उद्योजकता व नवीन कल्पकतांना प्रोत्साहन देणे : यासाठी ज्ञान / संशोधक केंद्रे व कल्पनाविस्ताराची सुविधा केंद्रे (Incubation Centre) यांना राज्यातील राख असणाऱ्या जागी प्रोत्साहन देणे.

५.५ भारत सरकारने वर्ष २०३० पर्यंत आपल्या देशातील उत्सर्जनाची तीव्रता सन २००५ च्या जीडीपीच्या स्तरापेक्षा ३०-३५ टक्के कमी करण्याचे ध्येय ठरवून दिले आहे. सदर ध्येय गाठण्यासाठी एक महत्त्वाचा हितकारी घटक म्हणून काम करणे.

६. **धोरण राबविण्यासाठी प्रोत्साहन व कार्यवाही :-**

अ) पर्यावरणस्नेही व्यवस्थापनासाठी क्षमता वाढविणे, मूल्यात भर घालणे आणि फ्लाय ॲशचा उपयोग करणे.

ब) या विषयाच्या माहितीचा प्रचार, प्रसार, प्रशिक्षण, तांत्रिक चर्चेची व्यासपीठे, आणि कार्यशाळा यांच्या मार्फत करण्यात येईल. तसेच या विषयाच्या तंत्रज्ञानाची देवघेव करण्यासाठी एक व्यापक माहितीचे जाळे (network) रचण्यात येईल. राखेची उपलब्धता, वापर व राखेपासून तयार केली जाणारी उत्पादने याची माहिती देणे व त्याविषयी जनतेमध्ये जागरुकता निर्माण करणे यासाठी विविध प्रसार माध्यमे, म्हणजेच वृत्तपत्रे, रेडीओ, दूरचित्रवाणीच्या वाहिन्या तसेच वेबसाईट, इंटरनेट इत्यादी सामाजिक माध्यमांतून जाहिराती / लेख / मुलाखती / बातम्या इत्यादी देण्यात येतील.

क) फ्लाय ॲशच्या क्षेत्रात सुरक्षित व्यवस्थापन तंत्रज्ञानाचा स्विकार केला जावा यासाठी संशोधन व विकास, मार्गदर्शन व इतर सोयी निर्माण करणे व त्यांना प्रोत्साहन व मदत करणे.

ड) राखेचा वापर वाढविण्यासाठी नवी क्षेत्रे, नव्या कल्पना, नवे मार्ग शोधणे.

इ) फ्लाय ॲशचा वापर करून टिकाऊ व कमी खर्चाची बांधकामे व इतर पायाभूत सेवांचे प्रकल्प विकसित करणे.

ई) फ्लाय ॲशच्या विटा, सिमेंट आदिंचे उत्पादन संयुक्त साहसी उपक्रमातून (Joint Venture) करण्यास मदत करणे.

७. <u>धोरणाची अंमलबजावणी :</u>

**७.१ फ्लाय ॲश परिषद ( Council ) गठित करणे :-** राज्य शासन या धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी एक फ्लाय ॲश परिषद गठित करीत आहे. या परिषदेचे अध्यक्ष, मुख्य सचिव असतील तसेच अन्य विभागाचे सचिव व इतर क्षेत्रातील तज्ञ, सदस्य म्हणून काम करतील. फ्लाय ॲश वापराच्या तंत्रज्ञानातील तज्ञ, वीज निर्मात्यांचे प्रतिनिधी व फ्लाय ॲश आधारीत लघु, मध्यम व मोठ्या अशा उद्योगांचे प्रतिनिधी यांना या परिषदेमध्ये सदस्य म्हणून आमंत्रित करण्यात येईल.

❖ **या फ्लाय ॲश परिषदेची रचना खालीलप्रमाणे राहील : -**

| अ.क्र. | पद | विभाग/संस्था |
|---|---|---|
| १. | अध्यक्ष | मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य |
| २. | सदस्य | अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग |
| ३. | सदस्य | प्रधान सचिव, ऊर्जा विभाग |
| ४. | सदस्य | प्रधान सचिव, उद्योग विभाग |
| ५. | सदस्य | अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ६. | सदस्य | सचिव, नगर विकास विभाग |
| ७. | सदस्य | सचिव, पर्यावरण विभाग |
| ८. | सदस्य सचिव | अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महानिर्मिती कंपनी |
| ९. | सदस्य | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ |
| १०. | सदस्य | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य गृह निर्माण मंडळ (म्हाडा) |
| ११. | सदस्य | सदस्य सचिव, राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग |
| १२. | सदस्य | फ्लाय ॲश व्यवस्थापनमधील तज्ञ |
| १३. | निमंत्रित सदस्य | IPP असोसिएशन/सिमेंट कंपनी/वीटा फ्लाय ॲश आधारित उद्योगांच्या संघटनांचे प्रत्येकी एक प्रतिनिधी यांना एका वर्षासाठी चक्राकार पद्धतीने |

- ❖ फ्लाय ॲश परिषद ही विविध संस्था व बांधकाम क्षेत्र इत्यादी यामध्ये वेगवेगळ्या प्रकारे केल्या जाणाऱ्या राखेच्या उपयोगाचे अनुबोधन व सूत्रसंचालन करणारी समन्वयक संस्था (Nodal Agency ) म्हणून काम करील.
- ❖ वीजनिर्मिती कंपन्या त्यांच्या मुख्यालयात तसेच प्रत्येक औष्णिक विद्युतकेंद्रात एक राख वापर कक्ष ( Ash Utilization Cell ) स्थापन करून हा कक्ष केवळ राखेसंदर्भात विषयासाठी समर्पित (Dedicated) असेल. या कक्षाकडे या क्षेत्रातील विविध जबाबदाऱ्या सोपविण्यात येतील. यामध्ये पणन व्यवहार दृष्टिकोनामधून ( Marketing Aspects ) फ्लाय ॲशची विक्री व फ्लाय ॲश आधारित उत्पादनाची विक्री यासंबंधीच्या कामांचा समावेश केला जाईल. राख व राख आधारित उत्पादने बाजारात इतर बांधकाम साहित्याप्रमाणे नेहमी उपलब्ध असावीत याची काळजी हा कक्ष घेईल.
- ❖ प्रत्येक वीज निर्मिती केंद्रात, विशेषत: वीज निर्मिती केंद्राच्या समूहात, पाळीपाळीने त्रैमासिक सभा आयोजित केल्या जातील. त्यात राखेच्या वापराच्या सर्वोत्कृष्ट पध्दतीच्या माहितीची देवघेव होईल व संबंधित विषयावर चर्चा केली जाईल.
- ❖ औष्णिक वीज केंद्रातील राखवापर कक्ष, ॲशबंडमधून राख बाहेर काढण्याचा खर्च (पाणी, वीज यांचे आकार इत्यादी ) यावर लक्ष ठेवील.
- ❖ औष्णिक वीज केंद्रातील राख वापर कक्ष, केंद्रातील कोळशात प्रत्यक्ष राखेचे प्रमाण व त्याचे वार्षिक सरासरी मूल्यांच्या आधारे राखेचा हिशेब ठेवेल.

**७.२ राख विक्री बाबत मार्गदर्शक तत्वे :-**

१. केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाच्या दिनांक १४.०९.१९९९ च्या अधिसूचनेमध्ये दिनांक २५.०१.२०१६ च्या अधिसूचनेद्वारे केलेल्या सूधारणेनुसार, वीज निर्मिती कंपन्या २० टक्के फ्लाय ॲश - विटा, ब्लॉक्स, फरशा व गृहनिर्माण / बांधकाम उद्योगातील इतर साहित्याच्या उत्पादनासाठी विनामूल्य देतील. एखाद्या विशिष्ट वीट निर्मिती केंद्राची मागणी २० टक्यापेक्षा कमी असल्यास, तेथील शिल्लक राख इतर वापराकरिता बाजारात निश्चित केलेल्या दराने देण्यात येईल.

२. मात्र वीट उत्पादकांना २० टक्के फ्लाय ॲश विनामूल्य देण्यापूर्वी वीज निर्मिती कंपन्यांनी वीट उत्पादकांना दिलेल्या राखेपैकी किमान ७० टक्के फ्लाय ॲश फक्त वीटा तयार करण्यासाठीच वापरली जात आहे व नदीतील वाळूचा वापर पूर्णपणे टाळण्यात आला आहे आणि त्या ऐवजी स्टोन क्रष्ड डस्ट वापरली आहे याची खात्री करण्यात येईल.

३. इको ब्रिक वर्ल्ड बुलेटीनच्या अहवालानुसार भारतातील मातीच्या विटा (क्ले ब्रिक्स) उद्योगाचे क्षेत्र दरवर्षी २४ दशलक्ष टन कोळसा वापरते. म्हणजेच देशातील एकूण कोळसा वापरापैकी ८ टक्के कोळसा वीट क्षेत्रात वापरला जातो. सरासरीने प्रत्येक १ लाख मातीच्या विटा (क्ले ब्रिक्स) निर्मितीसाठी १८ टन कोळसा वापरला जातो. फ्लाय अॅशचा ३० टक्के वापर केला तर कोळशाचा वापर १२ टन इतका कमी करता येईल. म्हणून ज्या क्ले-फ्लाय अॅश वीट निर्मात्यांनी कोळसा वापर कमी केला आहे आणि ज्यांची जिल्हा उद्योग केंद्राच्या प्रमुख व्यवस्थापकांनी (GM) शिफारस केली आहे; त्यांना फ्लाय अॅश देण्यात प्राधान्य मिळेल याची खातर जमा वीज निर्मात्यांनी करावी.

४. प्रत्येक औष्णिक विद्युत केंद्रातील फ्लाय अॅशची किमान किंमत, आणि अॅश बंड विकसित करण्याचा आकार फ्लाय अॅश परिषदेच्या संमतीने स्थापित केलेल्या समितीशी सल्ला मसलत करून औष्णिक विद्युत केंद्राने निश्चित करावा. या समितीचे प्रमुख कॉर्पोरेट अॅश युटीलायझेशन सेलचे इन-चार्ज असतील व समितीचे दोन सदस्य कंपनीच्या मुख्य कार्यालयाचे प्रतिनिधी दोन सदस्य संबंधित औष्णिक विद्युत केंद्राचे सल्लागार प्रतिनिधी असतील.

५. राखेच्या वापरात सुधारणा करण्यासाठी वीज निर्माते, पॉंड अॅश या प्रकारची राख एन.एच.ए.आय. / पी.डब्ल्यू.डी / इतर बांधकाम प्रकल्प यांना पुरवतील. बांधकाम साहित्य म्हणून फ्लाय अॅशचा वापर करण्यासाठी सी. पी. डब्ल्यू / पी.डब्ल्यू.डी, बांधकाम संस्था, भारतीय मानकसंस्था, रस्ते व महामार्ग वाहतूक, जलक्षेत्र, रेल्वे व खाणकाम क्षेत्र इ. चे तांत्रिक निर्देश, दरांची सूची, दरांचे विश्लेषण, निविदा, कागदपत्रे आदींचे पालन करणे आवश्यक आहे.

## ८. <u>कोळसा व लिग्नाईट आधारीत औष्णिक वीज निर्मिती केंद्रानी फ्लाय अॅश विकण्यासंदर्भातील अटी :-</u>

८.१ विटा, ब्लॉक्स किंवा टाईल्स यांच्या उत्पादकांना पॉंड अॅश, प्राधान्याने जशी व जेथे आहे तेथून या तत्वावर विनामूल्य उपलब्ध करून द्यावी. या उत्पादकांमध्ये शेतकरी, माती व फ्लाय अॅशच्या विटा तयार करणारे उत्पादक, केंद्र व राज्यातील रस्ते बांधकाम करणाऱ्या संस्था, सार्वजनिक बांधकाम विभाग आणि पुर्नभरण करणाऱ्या किंवा खाणी भरणाऱ्या संस्था यांचाही समावेश आहे.

८.२ केंद्र शासनाच्या पर्यावरण, वन व जलवायू मंत्रालयाच्या दिनांक २५ जानेवारी, २०१६ च्या अधिसूचनेनुसार सर्व कोळसा किंवा लिग्नाईट आधारीत औष्णिक वीज केंद्रे, त्यांची विस्तार केंद्रे यांनी उत्पादित होणाऱ्या १००% फ्लाय ॲश वापराबाबत दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची अंमलबजावणी दिनांक ३१ डिसेंबर, २०१७ पूर्वी करणे आवश्यक आहे.

## ९. धोरणाची राज्य फ्लाय ॲश परिषद मार्फत अंमलबजावणी :-

### ९.१ राखेच्या वस्तूचे उद्योग सुरु करणे व त्यासाठी प्रोत्साहित करणे :-

फ्लाय ॲश धोरणाचे प्रेरक सूत्रधार राज्य फ्लाय ॲश परिषद असून ते राज्याच्या बांधिलकीला योग्य ती दिशा देईल. या बांधीलकीमध्ये राज्यातील प्रतिभासंचाचा (Talent Pool) विस्तार करून दीर्घ मुदतीच्या मत्तांची (Assets) निर्मिती करणे, पायाभूत सुविधा वाढविणे आणि नवीन संशोधनाची व उद्योजकतेची संस्कृती वाढवणे आदि कार्यांचा समावेश आहे. या अंमलबजावणीसाठी मिशनच्या माध्यमातून खालील प्रमाणे निश्चित उपक्रम राबवून उत्तेजन देण्यात येईल.

अ) फ्लाय ॲश उपयोगितेची औद्योगिक स्थळे (UTILIZATION PARK) स्थापन करण्यासाठी प्रोत्साहन देणे व तरतुदी करणे.

ब) फ्लाय ॲश आधारीत उद्योग संस्थासाठी प्रोत्साहने व तरतुदी करणे.

क) संशोधन आणि विकास (R & D) तसेच नाविन्यपूर्ण (Innovation) फ्लाय ॲश संबंधित उद्योग, उत्पादने याकरिता Incubation Facility स्थापित करणे.

ड) फ्लाय ॲश वापराने हरित तंत्रज्ञानाला (Green Technology) प्रोत्साहन देणे.

इ) उद्योग व्यवस्थित सुरु करण्यासाठी कायदे विषयक मार्गदर्शन करणे.

ई) मानव संसाधनाचा विकास करणे, प्रशासकीय उपाय योजना करणे.

### ९.२ इतर संस्थांच्या सहाय्याने घरे बांधणी / प्रकल्प उभारणी इत्यांदीसाठी राखेचा उपयोग.

❖ महानिर्मिती कंपनीची सहाध्यायी कंपनी (Sister Concern company) महानिर्मिती कंपनी राख व्यवस्थापन सेवा मर्या. (MAHAGAMS) ची स्थापना केली आहे. महानिर्मीतीचे त्यांचे वर्ग -३ व वर्ग-४ निवृत्त कर्मचारी, कंत्राटी कामगार इत्यादिंसाठी गृह बांधणीच्या प्रस्तावित प्रकल्पाची कार्यवाही, स्वत:च्या जागेवर

करण्याचे नियोजन आहे. तसेच, म्हाडा, एम. एम. आर. डी. ए., सिडको, इत्यादी गृह बांधणी क्षेत्राशी संबंधीत संस्थांच्या सहकार्याने सदर गृह निर्माण प्रकल्प राबविण्यात येतील किंवा अशा प्रकारच्या केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या संस्था / एजन्सी मार्फतही हे प्रकल्प राबविण्याबाबत विचार करण्यात येईल.

- ❖ म्हाडा व सिडको हे महाराष्ट्र शासनाचे गृह बांधणी व नागरी विकास करण्याचे उपक्रम असून या संस्थेद्वारे शासनाचे विविध उपक्रम राबविले जातात. त्यामध्ये गरीब व सामान्य लोकांसाठी अल्प उत्पन्न, मध्यम उत्पन्न, व उच्च उत्पन्न गट या प्रकारात घरे बांधली जातात. तसेच एखादी रहिवासी वसाहत बांधली जाते. असे करीत असताना शासनाच्या जागेवर किंवा शासनाने अधिग्रहीत केलेल्या जागेवर निवासी किंवा तत्सम बांधकामास विशेष बाब म्हणून २.५ पट चटईक्षेत्र (2.5 Times FSI) शासनाकडून प्रदान केले जाते. त्याच धर्तीवर महाजेम्स ही महानिर्मिती कंपनीची संलग्न कंपनी असल्याने या संस्थेचे ध्येय औष्णिक विद्युत केंद्रामधून निर्माण होणाऱ्या फ्लाय ॲशचा वापर घरे बांधण्यासाठी व बांधकाम साहित्य तयार करण्यासाठी करुन महाजेम्स कंपनीद्वारे त्यांच्या वर्ग-३ व वर्ग-४ मधील निवृत्त कर्मचारी, कंत्राटी कामगार इत्यांदीसाठी घरे बांधण्यांचा उपक्रम राबवणार असल्याने एक विशेष बाब म्हणून महाजेम्स कंपनीला २.५ पट चटईक्षेत्र (2.5 Times FSI) देण्याचे प्रस्तावित आहे.

**१०. राज्य फ्लाय ॲश परिषदे मार्फत आर्थिकेतर (Non-Fiscal) सहाय्य :**

राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर फ्लाय ॲश उपयोगिता वाढविण्यासाठी राज्य शासन भारतीय व परदेशातील संयुक्त प्रकल्पांना प्रोत्साहन देईल. त्यानुषंगाने विदेशी गुंतवणूकदारांना त्यांच्या बौद्धिक संपदा संरक्षणाची हमी बौद्धिक संपदा कायद्यांतर्गत देण्यात येईल. भारताने जागतिक व्यापार संस्थेसोबत करार करण्याची संमती दिलेली असून या करारांतर्गत बौद्धिक संपदा कायदा दिनांक ०१.०१.१९९५ पासून अंमलात आणला आहे. या कायद्यान्वये बौद्धिक संपदेचे संरक्षण करण्यात येऊन आंतरराष्ट्रीय व्यापारात येणारे अडथळे टाळून त्यात वृद्धी करण्याचे प्रयत्न करण्यात येतील. या कायद्याच्या किमान पातळी अंतर्गत विविध भागीदार संस्था, सभासद देश यांची न्यायीक व्यवस्था व त्यांचे हितसंबंध या कराराअंतर्गत सुरक्षित केले जातील.

## ११. फ्लाय ॲश परिषद आणि फ्लाय ॲशवर आधारित प्रकल्पांसाठी आर्थिक सहाय्य :

**११.१** केंद्र शासनाच्या पर्यावरण व वन मंत्रालयाच्या दिनांक ०३.०४.२००७ च्या अधिसूचनेनुसार फ्लाय ॲशच्या विक्रीतून आणि फ्लाय ॲश उत्पादनाच्या विक्रीतून प्राप्त होणारा निधी हा प्रत्येक विद्युत निर्मिती केंद्राच्या स्वतंत्र लेखा विभागांतर्गत जमा केला जातो. फ्लाय ॲश परिषदेमार्फत फ्लाय ॲश धोरण प्रोत्साहन योजना राबविण्यासाठी लागणारा निधी विविध विद्युत निर्मिती केंद्रांमार्फत वरील रक्कमेच्या ०.५ टक्के हा ॲश विक्रीतून उपलब्ध केला जाईल.

**११.२** कोळशावर उपकर (Clean Energy Cess on Coal) - केंद्र शासनाने दिनांक ०१.०३.२०१६ च्या आदेशानुसार कोळशावर प्रती टनास रुपये ४००/-या दराने एक उपकर लावला असून त्याद्वारे राष्ट्रीय स्वच्छ पर्यावरण निधी तयार होतो. त्याचा वापर स्वच्छ उर्जेचे तंत्रज्ञान व संबंधित प्रकल्प यासाठी केला जातो. सन २०१४-१५ पर्यंत एकूण रुपये १७०.८४ अब्ज इतका निधी जमा झाला असून हा निधी स्वच्छ ऊर्जा प्रकल्पासाठी उपलब्ध आहे. या निधीतून राज्याच्या राखेच्या वापरासंबंधी धोरणाच्या प्रोत्साहनाकरिता निधी मिळण्यासाठी कोळसा मंत्रालय, भारत सरकार यांना विनंती करण्यात येईल आणि हा निधी फ्लाय ॲश उपयोगिता धोरण उभारणीसाठी फ्लाय ॲश परिषदेमार्फत उपयोगात आणण्यात येईल.

### ११.३ राष्ट्रीय अनुकूलता निधी : (National Adaptation Fund)

- केंद्र शासनाने एक राष्ट्रीय अनुकूलता निधी स्थापन केला असून त्यात प्रारंभी रुपये ३,५०० दशलक्ष इतका निधी जमा केला आहे. सदर निधीचा वापर शेती, पाणी, वनीकरण या क्षेत्रातील परिस्थितीच्या गरजा भागविण्यासाठी केला जातो. संबधित मंत्रालयातर्फे खर्च केलेल्या रकमेव्यतिरिक्त या निधीतून सहाय्य केले जाते. फ्लाय ॲशचा १०० टक्के वापर केल्यामुळे कोळसा आधारित वीज निर्मिती केंद्रातील प्रदूषण, वैश्विक उष्णतावाढ (globalwarming) आणि हवामान बदल या समस्यांचे अनिष्ट प्रभाव कमी करण्यासाठी मदत होणार असून फ्लाय ॲश धोरणाच्या प्रसारासाठी या निधीतून पैसा उपलब्ध करून द्यावा अशी विनंती केंद्र शासनाला करण्यात येईल.
- सद्यस्थितीत सदर धोरण राबविण्यासाठी लागणारी निर्धारित रक्कम निश्चित करणे शक्य नाही. ही रक्कम केंद्र सरकारने राज्य शासनाला दिलेल्या हिश्यावर अवलंबून राहील.

## १२. <u>फ्लाय ॲश धोरण प्रभावीरित्या राबविण्यासाठी शासनाची कटीबद्धता :-</u>

- ❖ महाराष्ट्र शासन, या धोरणाची अंमलबजावणी करून १०० टक्के फ्लाय ॲश वापरण्याचे ध्येय साध्य करण्यासाठी कटीबद्ध आहे.
- ❖ राज्यातील सर्व औष्णिक विद्युत निर्मिती केंद्रे, (कोळसा आधारित/बायोमास आधारित (Biomass)/घनकचरा विद्युत निर्मिती प्रकल्प (Waste to Energy Project), शासनातील संबंधित विभाग, फ्लाय ॲश आधारित उत्पादनांचे उत्पादक हे सर्व ध्येय साध्य करण्यासाठी कटीबद्ध राहतील.
- ❖ या धोरणाची अंमलबजावणी प्रभावीपणे व्हावी यासाठी एका स्वतंत्र संस्थेकडून या धोरणाचे मध्यावधी मूल्यांकन प्रारंभी अडीच वर्षानंतर व ५ वर्षानंतर करण्यात येईल. हे स्वतंत्र संस्थेकडून करण्यात येणारे हे मूल्यांकन सन २०१६ ते सन २०२० या कालावधीसाठी असेल.

## १३. <u>फ्लाय ॲश उपयोगिता धोरणांतर्गत शासनाच्या संबंधित विभागांनी त्यांच्या अखत्यारित करावयाच्या कार्यवाहीबाबत तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-</u>

<u>उद्योग विभाग :-</u>

औष्णिक विद्युत केंद्राच्या परिसरात फ्लाय ॲशवर आधारित ज्या औद्योगिक वसाहती निर्माण होतील त्यांना **<u>डी +</u>** दर्जा देऊन त्या अनुषंगाने सोयी सुविधा /सवलती देण्याबाबत व क्लस्टरमध्ये "मेगा प्रोजेक्ट" करिता उद्योगाच्या सवलती देण्याबाबत उद्योग विभागाकडून आदेश निर्गमित करण्यात येतील. तसेच सिनोस्पियर (Cenosphere) आधारित उद्योगांना चालना देण्यासाठी तसेच त्यामाध्यमातून निर्यातीला प्रोत्साहन देण्यासाठी उद्योग विभागाकडून आवश्यक कार्यवाही करण्यात येईल.

<u>सार्वजनिक बांधकाम विभाग</u> :-

औष्णिक विद्युत केंद्रापासूनच्या ३०० कि.मी. परिसरातील क्षेत्रात निर्माण केलेले/ बांधलेले रस्ते व इतर पायाभूत सुविधा इत्यादिंच्या खर्चाची कंत्राटदारास अदायगी संबंधित औष्णिक निर्मिती (TPP/TPS) केंद्रामधून राख घेतल्याबद्दलचे प्रमाणपत्र सादर करण्याशी जोडण्यात यावी, असे प्रमाणपत्र सादर केल्यानंतरच त्यांच्या कामाचे पैसे देण्यात येतील. अशा प्रकारच्या सूचना केंद्रीय पर्यावरण मंत्रालयाने दि. २५.०१.२०१६ रोजी निर्गमित केलेल्या अधिसूचनेमध्ये देण्यात आलेल्या आहेत व त्यानुसार सर्व मुख्य अभियंत्यांना सार्वजनिक बांधकाम विभागाकडून सूचना देण्यात आल्या आहेत. तसेच महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास रस्ते बांधणी व शासकीय इमारतींच्या

बांधकामामध्ये आय.एस. मानकांच्या तरतुदीप्रमाणे फ्लाय ॲशाचा वापर करणे संदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाकडून आवश्यक सूचना निर्गमित करण्यात येतील.

**<u>गृह निर्माण विभाग</u> :-**

महाराष्ट्र गृह निर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरण यांना घर

बांधणी क्षेत्रातील सर्व बांधकामांसाठी कोरड्या राखेपासून बनविलेल्या बांधकाम साहित्याचा वापर प्राथम्याने करणेबाबत गृह निर्माण विभागामार्फत मार्गदर्शक सूचना देण्यात येतील.

**<u>नगर विकास विभाग</u> :-**

महानगर पालिका क्षेत्रातील १ दश लक्ष किंवा त्याहून अधिक लोकसंख्या असलेल्या शहरातील बांधकामासाठी फ्लाय ॲश आधारित बांधकाम साहित्य वापरणे बंधनकारक करण्यासाठी इमारतींचे उपविधीमध्ये (Bye- Laws) दुरुस्त्या करण्याबाबत महानगरपालिकांना सूचना देण्यात येतील. तसेच, महानगरपालिका व नगरपालिका क्षेत्रातील रस्त्यांच्या बांधकामासाठी अथवा दुरुस्तीसाठी राखेचा वापर करण्यासाठी नगर विकास विभागाकडून सूचना देण्यात येतील.

**<u>पर्यावरण विभाग</u> :-**

बंद कंटेनर मधून राखेची वाहतूक करणे, प्रदूषण नियंत्रण उपकरणांची कार्यक्षमता वाढविणे, पर्यावरणाचे संरक्षण करण्यासाठी बांधकामात फ्लाय ॲशच्या वापरास प्राधान्य देणे व वापरात नसलेले राख बंधारे शास्त्रोक्त पद्धतीने बंद करण्यासाठी महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ यांना पर्यावरण विभागाकडून मार्गदर्शक सूचना देण्यात येतील. तसेच फ्लाय ॲश आधारित उद्योगांना अर्थ सहाय्य देण्याबाबत तसेच फ्लाय ॲशच्या क्लस्टरच्या उभारणीसाठी एस.पी.व्ही (Special purpose Vehicle) विद्युत निर्मिती प्रकल्प, उद्योजक इ. यांच्या सहभागाने प्रस्ताव सादर करण्यात येईल. वीटा व इतर बांधकाम साहित्यामध्ये वाळूचा उपयोग थांबविण्यासाठी आवश्यक ते आदेश निर्गमित करण्यात येतील.

**<u>जलसंपदा विभाग</u> :-**

पाटबंधारे विकास महामंडळे यांना धरणे, बंधारे इत्यादिंच्या बांधकामांमध्ये फ्लाय ॲश चा वापर करणेबाबत या विभागाकडून मार्गदर्शक सूचना देण्यात येतील.

**<u>कृषी विभाग</u> :-**

कृषी आयुक्तालयामार्फत शेतकऱ्यांना शेत जमीनीचा पोत सुधारण्यासाठी फ्लाय ॲशचा वापर करण्याबाबत प्रोत्साहित करण्यात येईल.

**<u>वित्त विभाग :-</u>**

फ्लाय ॲश आधारित उद्योगांना सध्या VAT माफी देण्याबाबत वित्त विभागाकडून कार्यवाही करण्यात येईल व GST लागू झाल्यावर केंद्र शासनाच्या धोरणानुसार अंमलबजावणी होईल.

**गृह विभाग (परिवहन) :-**

विद्युत निर्मिती केंद्राच्या ५ किलोमीटर त्रिज्येच्या आत राखेवर आधारित उद्योग आणि क्लस्टरमध्ये स्थापित उद्योग यांना ट्रक, ट्रॅक्टर व इतर वाहनांमध्ये राखेची वाहतूक करण्यासाठी परवानगी देण्यात येईल. परंतु उघडया वाहनातून वाहतूक करण्यासाठी परवानगी देण्यात येणार नाही. ५ किलो मीटर ते ३०० किलो मीटर त्रिज्या किंवा त्याच्या बाहेर असणारे उद्योग यांना राख फक्त बंदिस्त बल्कर मधूनच वाहतूक करावी लागेल. सदरची वाहतूक करताना वाऱ्याने राख उडून जनतेची गैरसोय व प्रदूषण होऊ नये यासाठी ताडपत्री किंवा प्लास्टीकने आच्छादीत करणे बंधनकारक राहील. सदर विभागातर्फे क्षेत्रीय कार्यालयांना योग्य त्या सूचना निर्गमित करण्यात येतील व त्याची कडक अंमलबजावणी करण्यात येईल.

**वन विभाग :-**

वृक्षा रोपण व वृक्ष संवर्धनाची कामे महाराष्ट्र राज्य वन विकास महामंडळ (FDCM) किंवा सामाजिक वनीकरण विभागामार्फत करण्यासाठी सूचना देण्यात येतील.

**महसूल विभाग :-**

फ्लाय ॲशवर आधारित उद्योगांसाठी शासकीय जमीन भाडेपट्टीने देणेबाबत प्रचलित धोरणानुसार शासनाचे सक्षम प्राधिकारी / संबंधित जिल्हाधिकारी यांचेमार्फत कार्यवाही करण्यात येईल.

**ग्राम विकास व जलसंधारण विभाग :-**

प्रधान मंत्री ग्राम सडक योजने अंतर्गत संशोधन व विकासाच्या कामात राष्ट्रीय विकास संस्थेकडून मंजूर करण्यात येत असलेल्या कामात आय.आर.सी.एस.पी. ५८ प्रमाणे सिमेंट कॉंक्रीटच्या रस्त्यात १५ ते ५०% सीमेंट ऐवजी फ्लाय ॲशचा वापर करण्यात येतो. तसेच, नवीन रस्ते बांधणीत माती कमकुवत असल्यास (CBR ५% पेक्षा कमी असल्यास) सदर मातीचे दृढीकरण (STABILIZATION) करण्यासाठी फ्लाय ॲशचा वापर करण्यात येतो. त्याच धर्तीवर मुख्यमंत्री ग्राम सडक योजनेमधील कामात फ्लाय ॲशचा वापर करणे बंधनकारक करण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना ग्राम विकास विभागाकडून निर्गमित करण्यात येतील.

**अल्पसंख्यांक विकास विभाग :-**

अल्प संख्यांकांच्या सामाजिक, शैक्षणिक व आर्थिक प्रगतीसाठी विविध योजनांतर्गत, या शासन निर्णयाचा आधारे, संबंधित यंत्रणेत आवश्यक त्या कार्यवाहीच्या सूचना देण्यात येतील.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१६१२२१११२८०२२६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Vilas Mahadeorao Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: CN = Vilas Mahadeorao Rajurkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Industry, Energy And Labour Department
Date: 2016.12.21 12:04:41 +05'30'

**( वि. म. राजुरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सर्व मंत्रालयीन विभाग
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र मुंबई-४०००२०
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
११.अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१४.संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
१५.मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, मुंबई
१६.अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कं. मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१७. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कं.मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१.
१८. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कं. मर्या., प्रकाशगंगा, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१.
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधार कंपनी मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई- ५१
२०. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने
२१. निवडनस्ती (ऊर्जा-४)